खासापूर मध्यम प्रकल्प,ता.परांडा,जि.धाराशिव प्रकल्पाच्या कालव्याच्या दुरुस्ती अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२३/ (प्र.क्र.३२४/२०२३)/ सिंव्य(कामे)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:- २१ ऑगस्ट, २०२४

**वाचा:-**

१. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र.जा.क्र.गोमपाविम- /सिंचन-२/विवसू कडा लातूर/ धा-२८/४९०१,दि. २६/०५/२०२३.
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे) दि. १/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे), दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे), दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३

**प्रस्तावना:-**

खासापूर मध्यम प्रकल्पाचे बांधकाम सन १९५० मध्ये सुरु करण्यात आले आहे. हा प्रकल्प स्थानिक नाला दुधना नदी वर खासापुरी ता.पंराडा येथे बांधण्यात आला आहे. प्रकल्पाचे पाणलोट क्षेत्र २१४.०० मैल असून या पाणलोट उपलब्ध २२.९८ दलघमी पाण्यापैकी १९.८१ द.ल.घ.मी.पाणी या प्रकल्पात साठविण्यात येत आहे. यासाठी १५३० मी. लांबीचे मातीधरण व ३५१.२० मी. लांबीचा सांडवा बांधण्यात आला आहे. परंडा तालुक्यातील २२४६ क्षेत्र सिंचनाचे उद्दिष्ट ठेऊन प्रकल्पाच्या डावा कालवा १४.४० कि.मी. व उजवा कालवा १७.६० असे दोन्हीवर ३२.०० किमी लांबीचे कालवे व वितरीका काढण्यात आले आहेत. सन १९५५ ते २०१७ या ६२ वर्षाच्या कालावधीत कालव्याचे मातीकाम व बांधकामे क्षतीग्रस्त झालेली आहेत. त्यामुळे पूर्ण क्षमतेने कालवे प्रवाहीत होत नाहीत व परिणामी सिंचनाचे उद्दिष्ट पूर्ण होऊ शकत नाही.

खासापूर मध्यम प्रकल्पाच्या उजवा व डाव्या कालव्यावर मोठ्या प्रमाणात झाडेझुडपे आढळून आलेली आहेत तसेच विमोचकांची पाहणी केली असता सदर विमोचकांना लोखंडी गेट नसल्याचे निदर्शनास आलेले आहे. तसेच कालव्यांवरील जलसेतूचे संधानक व दगडी बांधकाम खराब झाल्याचे आढळून आले आहे. त्यामुळे खासापूर मध्यम प्रकल्पावरील अस्तरीकरण, भराव काम व विविध बांधकामाची दुरुस्ती होणे आवश्यक आहे. सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर अंदाजे ५०० हेक्टर सिंचन क्षेत्र पुनर्स्थापित होणार असून, तसेच पाणी बचत व सिंचनात वाढ होणार आहे.

या पार्श्वभूमीवर खासापूर मध्यम प्रकल्प,ता.परांडा,जि.धाराशिव कामाचे अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याप्रमाणे शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत खासापूर मध्यम प्रकल्प,ता.परांडा,जि.धाराशिव कामाचे अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत रू १,३८,२३,१०२/- (रू. एक कोटी अडतीस लक्ष तेवीस हजार एकशे दोन फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता , निविदा प्रक्रिया , कामाचे नियोजन व पूर्णत्व , प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

५) सदर दुरुस्ती काम सुरु करण्यापूर्वी प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करुन लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपुर्ण जबाबदारी क्षेत्रिय अधिका-यांची राहील.

६) प्रस्तावित दुरस्तीकामांद्वारे अंदाजे ५०० हेक्टर सिंचन क्षेत्र पुनर्स्थापित करण्याची जबाबदारी क्षेत्रिय अधिकारी यांची राहील.

७) प्रत्यक्ष सिंचन व पाणीपट्टी वाढविण्याकरिता संबंधित अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी विशेष प्रयत्न करावेत.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०१ मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०- सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (१०)(०२) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (मराठवाडा विभाग) (कार्यक्रम) (४७०१ जे १४९) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. १६ सन २०२४-२५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०८२११७०९४५२४२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.08.21 17:27:57 +05'30'

**( न. गौ. बसेर )**
**शासनाच्या उप सचिव**

**सोबत :- सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा/वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव,

४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई

५) मा.उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

८) अप्पर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.

९) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.

१०) अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग , मंत्रालय,मुंबई

११) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) ,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१२) सचिव (प्रकल्प समन्वय) , जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

१४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१५) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर

१६) मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक ,लाभक्षेत्र विकास ,जलसंपदा विभाग , छत्रपती संभाजीनगर

१७) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१८) अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, लातूर

१९) कार्यकारी अभियंता,धाराशिव पाटबंधारे विभाग क्र. १ ,धाराशिव.

२०) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२३/ (प्र.क्र.३२४/२०२३)/ सिंव्य (कामे),**

**दि. २१/ ८ / २०२४ चे सहपत्र**

| **Sr.No.** | **Description of Item** | **Amount in ( Rs. )** |
|---|---|---|
| 1 | C - Works (Excluding Royalty) | 10380025 |
| 2 | Royalty | 1470873 |
| 3 | १ % Insurance | 103800 |
| 4 | १८ % GST | 1868404 |
| | **Total Rs.** | 1,38,23,102 |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.08.21 17:28:19 +05'30'

**( न. गौ. बसेर )**
**शासनाच्या उप सचिव**